# दुष्काळ निदर्शन

अथवा

## हिंदुस्थानांतील दुष्काळाचीं कारणें

व

## तीं टाळण्याविषयीं राजा व प्रजा

## ह्यांचीं कर्तव्यें

हें पुस्तक

**बाळकृष्ण रावजी पालवणकर**

रा० तळें ता० माणगांव जि० कुलाबा

यांनीं लिहिलें

—○:×·*×:○—

तें

पुणें येथें

" चित्रशाळा " छापखान्यांत छापिलें.

शके १८२१ सन १८९९

किंमत दोन आणे

# प्रस्तावना.



परवशतेची दुर्भेद्य शृंखला आमच्या पायांत पडल्यापासून आम्हांस सुख म्हणजे काय वस्तु आहे, ती कशी असते व तिचा लाभ आम्हांस कधीं मिळेल ह्याची कोणास कल्पनाही नाहीं. कारण आम्हांस सौख्य कसें तें माहीतच नाहीं! दुःख मात्र कसें असतें तें आम्हीं जाणतों व त्याचा उपयोग आम्हांस जाणून बुजून करावयास लागतोच असें नाहीं. अशी स्थिती क्षणमात्रें कां व्हावी? असा एखाद्यानें प्रश्न केल्यास त्याचें उत्तर देणें मोठें कठीण आहे. श्रीमंतापासून तों गरीबापर्यंत, शेतकऱ्यापासून तों व्यापाऱ्यापर्यंत यच्चयावत् जागीं अन्न आणि वस्त्र यांची सुद्धां पंचाईत पडावयास लागली आहे! हिंदुस्थान सारख्या सुपिक देशांत अन्न आणि मोठें धोटें वस्त्र याला महर्गत भासावी ही मोठ्या सखेदाश्चर्याची गोष्ट आहे! परन्तु आमच्या सरकारच्या अतिरेक द्रव्यतृष्णेंमुळें व अल्प जनदोषामुळें आमचेवर हे परिणाम घडावयास लागले आहेत म्हणजे दुष्काळ पडावयास लागले आहेत. हे दुष्काळ नेहमीं कां पडतात व तत्प्रतिबंधनार्थ काय केलें पाहिजे एवढेंच जनदृष्टीनें व राजदृष्टीनें दाखविण्याचा ह्या लहानशा पुस्तकाचा हेतु आहे. ही आमची

प्रथम लेखणीच असल्यामुळें ह्यांत दोष असण्याचा संभव आहे तरी सुज्ञांनीं ते कळविल्यास त्यांचा उपयोग द्वितीयावृत्ती वेळेस अवश्य करण्यांत येईल.

तळें ता० माणगांव जि० कुलाबा ता० ९।१२।९९. } बाळकृष्ण रावजी पालवणकर.

---

# हिंदुस्थानांतील दुष्काळाचीं कारणें व तीं टाळण्याविषयीं लोकांचीं राजाचीं व कर्तव्यें.

उपोद्घातः—सांप्रतकाळीं खेडेगांवीं जाऊन खेड्यांतील कुणब्यांचीं शरीरें कोणीही समंजस मनुष्य पहावयास लागला तर त्याला पुराणांतरीच्या सुदाम देवाची स्मृती झाल्याविना रहाणार नाहीं. पांच वर्षांपूर्वीं जो कुणबी चांगला धट्टाकट्टा असून भरज्वानींत होता, दगड फोडण्याचें ज्याला सामर्थ्य होतें तोच आज कंगाल असून साधारण हातपाय हालविण्याच्या स्थितींत आहे असें त्याच्या दृष्टीस पडेल. एका कुणब्याची जी स्थिती तीच सर्व कुणब्यांविषयीं त्याच्या बायकापोरांविषयीं व साधारण शेतकऱ्यांविषयीं होय. ही खेडेगांवची स्थिती झाली. लहान मोठ्या शहरांतल्या आणि गांवांतल्याही गरीब कुटुंबांची हीच स्थिती झालेली निदर्शनास येते. अशी स्थिती कां झाली आहे, ही कल्पना पोरांबाळांस किंवा बादशाहींतील प्रसिद्ध तत्वांप्रमाणें ज्यांच्यावर लक्ष्मीची पूर्ण कृपादृष्टी आहे अशा लोकांस माहीत असण्याचा मुळींच संभव नाहीं. कपाळ कसें दुखतें तें सांगतां येणें जसें कठीण आहे तद्वतच " **घरांत वाजे नकार घंटा** " अशांच्या घरांतील स्थिती सांगतां येणें

कठीण आहे. प्रस्तुत सर्व हिंदुस्थानांतील कोणत्याही ठिकाणीं गेलें असतां अशीच स्थिती दृष्टीस पडेल. कांहीं कांहीं खेडीं तर ओसाड पडलेलीं दिसतील, कित्येक मोठमोठीं कुटुंबें देशोधडीस लागलीं असतील, इत्यादि कोणता नाहीं कोणता तरी दुःखदायक परिणाम मनावर उमटल्याशिवाय रहाणार नाहीं. असे दुःखदायक परिणाम दाखविण्याची शक्ति ज्या काळाच्या अंगांत आहे त्या काळाच्या स्वरूपाविषयीं ह्मणजे दुष्काळाविषयीं लिहिण्याचा आमचा विचार आहे.

मनुष्याच्या जीवनाला हवा, अन्न आणि पाणी हे तीन पदार्थ अत्यंत आवश्यक आहेत. या तिहींपैकीं दुसरे दोन म्हणजे पाणी आणि अन्न हे मिळविण्याला थोडा तरी श्रम लागतो. पुष्कळ श्रमानेंही ज्या वेळीं हे पदार्थ मिळेनासे होतात त्या काळाला दुष्काळ असें म्हणण्याची प्रवृत्ती आहे. हा या शब्दाचा रुढार्थ झाला. अवयवार्थच पाहिला असतां दुःसहः—वाईट व काळः—प्रसंग मिळून वाईट काळ असा अर्थ झाला. वाईट काळ अनेक प्रकारचे असूं शकतील. ज्याला आपण दुःख असें म्हणतों तें प्राप्त झालें म्हणजे त्यालाच दुष्काळ असें अवयव अर्थानें नांव देतां येईल. कारण मनाला जी प्रतिकूल वेदना तिला दुःख असें म्हणतात अर्थात् दुःखाचे वेळीं मनाला कोणत्या तरी प्रकारें

दुष्काळच असतो. आतां सुख आणि दुःख हीं मानीव आहेत ही गोष्ट जरी खरी आहे तरी ज्याच्या त्याच्या मनाच्या स्थितीनें या अर्थाला प्रतिबंध येणार नाहीं. एवढा विस्तृत अर्थ जरी दुष्काळ या शब्दांत आहे तरी प्रस्तुत प्रसंगीं इतक्या व्यापक अर्थानें या शब्दाचा उपयोग करितां येत नाहीं या करितां "ज्या काळांत मोठें धोटें अन्नवस्त्र मिळविण्याला बऱ्याच लोकांना अडचण पडते अशा काळाला दुष्काळ असें ह्मणावयाचें." आणि या दुष्काळाचा सार्वत्रिक विचार न करितां फक्त नांव **'सोनूबाई आणि हातीं कथलाचा वाळा'** या म्हणीला यथार्थ पात्र झालेल्या सुवर्ण भूमिनामक हिंदुस्थानाविषयींच दिग्दर्शन करावयाचें आहे. अलिकडे सरासरी मानानें वीस वर्षांतीं फार मोठा असा आपल्या देशांत दुष्काळ पडतो; असा अनुभव आला आहे. वास्तविक पाहतां हल्लीं हिंदुस्थानांत दररोज दुष्काळच आहे असें म्हणण्याला कांहीं हरकत नाहीं. परंतु नित्यक्रमापेक्षां विशेष महत्वाचा असा जो प्रतिवीस वार्षिक दुष्काळ, अशा सारखे जे दुर्धर प्रसंग; आपल्या देशावर ओढवतात. ते ओढवण्याचीं कारणें कोणतीं? हा या विषयांतला पहिला भाग आहे. तसेंच असे प्रसंग न येण्या करितां लोकांनीं काय केलें पाहिजे ? हा या विषयांतील दुसरा भाग आहे. व दुष्काळाला राजकारणें कोणतीं व तत्प्रतिबंधनार्थ राजानें काय केलें पाहिजे? हा या विषयांतील तिसरा भाग आहे.

पहिल्या भागांत सामान्यतः दुष्काळ पडण्याचीं कारणें काय काय संभवतात, त्या कारणांचा आपल्या देशाशीं कसा संबंध पोंचतो ह्याचें विवेचन येईल. तसेंच दुष्काळ निवारण्याची सामान्य कार्यें कोणतीं व आपल्या देशाला त्यांचा कितपत उपयोग होईल, ह्या गोष्टी दुसऱ्या भागाच्या पोटीं येतील. व दुष्काळ पडण्याला सरकारी कारणें कोणतीं व तन्निवारणार्थ सरकारला काय केलें पाहिजे, ह्याचें विवेचन तिसऱ्या भागांत येईल. ह्या भागांचें आतां क्रमानुवार वर्णन करावयाचें आहे.

---

# भाग १ ला.

## हिंदुस्थानांतील दुष्काळाचीं कारणें.

**अतिवृष्टि रनावृष्टि मूषकाः शलभाः शुकाः ॥**
**स्वचक्रं परचक्रंच सप्तैता ईतय स्मृताः ॥ १ ॥**

आपल्या या निष्कांचन हिंदुस्थानामध्यें अलीकडे जो प्रतिवर्षीस वार्षिक दुष्काळ पडावयास लागला आहे तो कां पडतो याचीं कारणें आपल्या पौराणामध्येंच सांगितलेलीं आहेत. तीं नव्यानेंच शोधून काढावयाची कांहीं जरूरी नाहीं. फक्त त्या कारणांची व्याख्या व तीं आपल्या देशाला कां हांनीभूत होतात याचा विचार कर्तव्य आहे. अतिवृष्टि, अनावृष्टि, उंदीर, पोपट, आणि टोळ यांचा उपद्रव, राज्यांतील बंडें व शत्रूची स्वारी हीं सात कारणें दुष्काळ पडण्याला कारणीभूत आहेत असें आमच्या पुराणांत सांगितलेलें आहे. या सात कारणांशिवाय जंगलाची तोड, किंवा मूळचीच जंगलाची कमतरता व्यापारवृद्धीच्या साधनांचा अभाव, देशांतील फार मोठा समुदाय शेतकामांत गुंतलेला अशीं आणखीही कारणें संभवतात. असो. दुष्काळाचें पहिलें कारण—

**अतिवृष्टी**—हें होय. ज्या देशांत जितके दिवस पाऊस पडावयाचा तितके दिवस पडला पर पडावयाचा

त्यापेक्षां फार पडला तर हिला वस्तुतः अतिवृष्टी असें नांव देतां येणार नाहीं, कारण पाऊस जास्त पडल्यामुळें जरी पाणथळ शेतजमिनी बुडाल्या तरी त्यापासून एकंदर उत्पन्नाला थोडा बहुत धोका येईल परंतु गेल्या दुष्काळासारखा भयंकर प्रसंग येण्याचा संभव नाहीं. पर जेव्हां असें होतें कीं, एकंदर वर्षांत जितका आणि जितके दिवस पाऊस लागावयाचा तितके दिवस न लागतां एकंदरींत पुष्कळ पाऊस पडला तर त्यापासून सर्वच प्रकारच्या शेतीला धक्का पोंचण्याचा संभव फार आहे. याला गेल्या दुष्काळाचें प्रत्यंतर पुरे आहे. आपल्या या प्रांतांत एका वर्षांत सुमारे १२५।१५० ईंच पर्यंत पपर्जन्य पडतो. परंतु इ. स. १८९७ सालीं दीड महिन्यांतच सुमारे १७५ ईंच पाऊस पडल्यामुळें गेल्या दुष्काळाचा भयंकर पराक्रम सर्व हिंदुस्थानीयांस दृग्गोचर झाला. इतका पाऊस पडून शेती सफाई बुडाली ती बुडालीच परंतु शेवटीं कांठण पिकण्यालाही जमिनीला ओल राहिलें नाहीं आणि पाण्याचाही अत्यंत हाहाःकार उडाला. यावरून वर्षांत जितका पर्जन्य पडावयाचा तितका थोड्या मुदतींत पडून गेला म्हणजे अतिवृष्टी झाली तर दुष्काळ पडतो हें सिद्ध झालें. दुष्काळाचें दुसरें कारण—

**अनावृष्टीः**—हें होय. अनावृष्टी म्हणजे वर्षांत जितके दिवसांत जितका पाऊस पडावयाचा तितका न पडतां

ज्या क्रमानें पडावयास पाहिजे त्या क्रमानेंही पडला नाहीं तर त्याच्या योगानें शेतकीला धक्का पोंचेल हें निराळें सांगावयास नको. जितका पाऊस पडतो तितका सर्व शेतकीला उपयोगी पडतोच असा नियम नाहीं. पण वेळच्या वेळीं पर्जन्य पडून तो पडावा त्यापेक्षां कमी पडला तरी चिंता नाहीं. कल्पना करा कीं, प्रत्येक मनुष्याला दररोज खाण्याचें धान्य -|||- शेर लागतें हेंच धान्य त्याला -|||- शेर न देतां -||- शेर प्रमाणें दिलें तर त्या मनुष्याची शक्ति विशेष क्षीण न होतां त्याचा नित्यक्रम यथास्थित चालेल. पण एक दिवस २ शेर व आठ दिवस कांहीं नाहीं असा क्रम चालणार नाहीं. तीच स्थिती पावसाची आहे. हंगामी जितका पाऊस पाहिजे त्यापेक्षां थोडासा जरी कमी पडला तरी चिंता नाहीं. पण एक दिवस पुष्कळ आणि आठ दिवस कांहीं नाहीं असें मात्र चालावयाचें नाहीं. तात्पर्य--पावसाळ्याचे दिवसांत एकंदरींत जितका पाऊस पाहिजे त्यापेक्षां थोडासा कमी पण वेळच्या वेळीं पडलेला, अशा पावसाला अनावृष्टी म्हणावयाचें नाहीं आणि अशा पावसापासून विशेष नुकसानही होत नाहीं पण वर्षांत जितका पर्जन्य पडावयाचा व जितके दिवस पडावयाचा तितका व तितके दिवस न पडतां गैर हंगामी आणि कमी पडतो अशा पर्जन्याला अनावृष्टी असें म्हणावयाचें. या पासून दुष्काळ पडतो हें सर्वत्र प्रसिद्धच आहे.

अतिवृष्टी व अनावृष्टी या उभयतांचा बहुतांशीं संयोग आहे असें म्हटलें असतां वावगें होणार नाहीं. कारण दोहोंपैकीं एकाचा अनुभव प्रथमतः आला म्हणजे दुसऱ्याचा तावडतोब पाठीमागून येतो. प्रथमतः अतिवृष्टी झाली म्हणजे नंतर अनावृष्टी होणें हें अगदीं साहजिक आहे. त्याचप्रमाणें प्रथमतः अनावृष्टीचा अनुभव आल्यास मागाहून अतिवृष्टीचा योग असणें सयुक्तिकच आहे. मिळून ह्या परस्पराभिन्न अशा बहिणी बहिणींचें एकीकरण एकाच वेळीं होतें यामुळें दुष्काळ साहाजिकच यावा व तो आह्मांस चांगलाच अनुभवास यावा यांत नवल तें काय? दुष्काळाचें तिसरें कारण—

**उंदीर, पोपट, आणि टोळ, यांचा उपद्रवः**—हें होय. टोळधाड आली असतां ती शेतांचा फन्ना कशी पाडते याविषयीं सर्वत्र प्रसिद्धीच आहे. आणि सुमारें १९ वर्षां पूर्वी याचा अल्पसा अनुभव सर्वांस आलेलाही आहे. ही टोळधाड आली तेव्हां शेतें वगैरे तयार झालेलीं नव्हतीं हें आमचें प्रालब्धच समजावयाचें. परन्तु * कुलाबा जिल्ह्यांत माड, पोफळी, आंबे यांचें जें नुकसान झालें तें अद्यापिही भरून आलें नाहीं. टोळांचें सर्वच विलक्षण

* या टोळधाडींत या ग्रंथकर्त्यांचेंही अतिशय नुकसान झालेलें आहे. आम्ही स्वानुभवावरून सुद्धां असें सांगतों कीं, या टोळधाडीनें दुष्काळच काय पर या पेक्षांही जास्त अशी संकट परंपरा ओढवेल.

आहे. यांचा समुदाय एका ठिकाणाहून अन्य ठिकाणीं जाऊं लागला म्हणजे ९।४ कोस लांबी रुंदीचा ढगच आकाशांत आला आहे असा भास होतो. ज्या शेतावर जाऊन बसतील त्याची मातीच करून टाकतील. एकीकडे खाण्याचें काम सपाट्यानें सुरू असतें व एकीकडे मलविसर्जनाचें काम चाललेलें असतें. यांची संततीही विलक्षण आहे. यांच्या अंड्यांची जी पेशी असते तींत ७९ पासून २०० पावेतों अंडीं असतात. अशा ह्या भयंकर सांथी पासून देश धुळीस मिळाल्याचीं शतशः उदाहरणें प्रसिद्ध आहेत. याप्रमाणेंच उंदीर आणि पोपट यांच्या योगानें नाश होतो असें प्राचीन वर्णन आहे. सांप्रतही ह्याचा अनुभव आहे परंतु दुष्काळ पडण्याइतका अनिर्वाच्य प्रसंग येत नाहीं व आला नाहीं व परमेश्वर कृपेनें तो पुढें न येवो अशी जगत्प्रभुजवळ विज्ञप्ति आहे. दुष्काळाला कारणीभूत असें सहावें कारण—**स्वचक्र म्हणजे राज्यांतील बंडें हें होय:**—बंड उत्पन्न झालें म्हणजे कोणताही धंदा नीट चालत नाहीं; मग सदोदीत श्रमाचा असा शेतकीचा धंदा तरी कसा चालावा ? तशांत शत्रूचा नाश करण्याची किंवा त्याला ताब्यांत आणण्याची युक्ति व तिचा उपयोग हीं तावडतोब अमलांत येत असतात. राज्यांत कितीही धंदे असले आणि कितीही कारखाने असले तरी ते सर्व शेतकरी वर्गावर अवलंबून असणार ! आधीं "पोटोबा" किंवा

"**सर्वारंभा स्तण्डुला प्रस्त मूलाः**" हें तत्व नेहमीं अबाधित चालावयाचेंच. बंडासारखी धामधूम उत्पन्न झाली म्हणजे शेतांची नासाडी फार होते. इतकेंच नव्हे तर शिल्लक असलेल्या धान्याचीही लूट पुष्कळ होते. यामुळें दुष्काळ पडण्याचा संभव फार असतो. अशाच रीतीनें—

**परचक्रः**—म्हणजे शत्रुची स्वारी ही दुष्काळाला कारणी भूत होते. फ्रान्स देशाचा प्रसिद्ध बादशाह नेपोलियन बोनापार्ट ह्यानें रशियाची राजधानी जें मास्को शहर त्याजवर हल्ला करण्याचा निश्चय केला. ही बातमी रशियाचे झारास कळतांच त्यानें सर्व शहरांत अशी ताकीद दिली होती कीं, शत्रु जवळ येऊन पोंचतांच सर्व शहराला एकदम आग लावून देऊन तुम्हीं पळून जावें. ही रशियाचे झाराची ताकीद नेपोलियनला समजली. परंतु मास्को सारखें राजधानीचें शहर, धनधान्य संपत्तीनें युक्त, त्यांत मोठमोठ्या इमारती असलें नवयौवन प्रफुल्लित शहर जाळून टाकतील हें त्याला खरें वाटेना ! ! परंतु शहराजवळ जातो तों ऐकिल्याप्रमाणेंच अनुभव आला. दुसरें प्रसिद्ध उदाहरण तैमूरलंगाची हिंदुस्थानावरील स्वारी हें होय. हिंदुस्थानांत प्रवेश केल्याबरोबर कत्तल, लूट, घरादाराची व शेताभाताची राखरांगोळी याला प्रारंभ इत्यादि अनेक घोर कृत्यें करीत करीत स्वारी मोठ्या थाटानें दिल्लीपर्यंत येऊन थडकली. पुष्कळ लोक ह्या

नुकसानीमुळें पुढें पडणाऱ्या दुष्काळांत मारावयाचे ते कत्तलींत मेले तरीही पुष्कळ भागांत दुष्काळ पडलाच होता सारांश--परचक्रापासून किंवा स्वचक्रापासून पाऊस पडूनही दुष्काळ पडतो. याप्रमाणें प्राचीन काळींच दुष्काळाचीं कारणें जीं लोकांच्या अनुभवास आलीं व येताहेत त्यांचा येथपावेतों विचार केला. आतां दुष्काळ पडण्याला अनावृष्टी म्हणून जें कारण आहे त्याचा संबंध पुष्कळांशीं झाडांशीं अवलंबून आहे करितां त्याचा पहिल्यानें विचार करून नंतर सर्व कारणांच्या आदी कारणांचा विचार करण्यास प्रारंभ करूं.

**जंगलाची तोडः**--अग्नीचा उपयोग समजावयास लागला तेव्हांच मनुष्याच्या सुधारणेला प्रारंभ झाला असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. या मनुष्यांनी सुधारणाकाळाच्या प्रारंभालाच प्राणीवर्गांतला जेष्ठ वर्ग म्हणजे वनस्पती यांच्या नाशाला सुरवात झाली. जीवनसाधनसंपन्न म्हणजे प्राणी आणि जीवनसाधनासंपन्न म्हणजे वनस्पती असे प्राण्याचे दोन वर्ग कल्पितात. या पैकीं वनस्पती वर्गाची उत्पत्ती प्राणी वर्गाच्या फार अगोदर पासून आहे असें भूगर्भशास्त्रवेत्त्यांचें मत आहे. कारण त्या वेळीं उष्णता, पाणी आणि कारबानिक आसिडवायू यांची अत्यंत समृद्धि होती. कोळशाच्या खाणीवरून असें दिसून येतें कीं, जे प्रदेश हल्लीं शीतकटिबंधांत आहेत तेथें आद्यकाळचीं अरण्यें, सांप्रत ऊष्णकटिबंधांत जीं दृष्टीस पडतात

त्यांहून फार मोठीं होतीं. अशा ह्या अवाढव्य अरण्याचा नाश मनुष्याला अग्नीचा उपयोग समजल्यापासून व्हावयास लागला आहे. मनुष्याला ही उद्भिज्य संपत्ती किती मिळाली आहे आणि होती याची गणनाच व्हावयाची नाहीं. परन्तु मनुष्य या संपत्तीचा सांचवून ठेवलेल्या द्रव्याप्रमाणें उपयोग करीत असल्यामुळें आज त्याच्यावर पर्यायानें दुष्काळासारखे भयंकर प्रसंग डोकावूं लागले आहेत. ही गोष्ट कांहीं देशांत दोनहजार वर्षां पूर्वीच लोकांनां कळून आली व त्यांनीं तावडतोब त्याची सुव्यवस्था लाविली; व त्या व्यवस्थेनें ते सुखीही बनले. असें प्राचीन काळच्या इतिहासांवरून स्पष्ट दिसून येतें. आमच्या देशाची स्थिती ' वारा लागेल तशी पाठ द्यावी ' याप्रमाणें वारंवार बदलणारी नसून " बाबा वाक्यं प्रमाणं " या प्रमाणें असल्यामुळें आम्ही आपल्या परिस्थितीचा मुळींच विचार करीत नाहीं. यामुळें आमच्यावर संकट परंपरा जशी काय ओथंबलेलीच आहे तरी देखील आम्ही आनंदीच ! आनंदी ह्मणण्यापेक्षां आ रहित आनंदी आहों असें ह्मटलें तर तेंही शोभण्यासारखें आहे. आतां हें विशेषण अतिशय हास्यास्पद कांहींकांच्या मनाला अतिशय दुःखास्पद होईल ! पण ज्यानां असें दुःख होईल ते या विशेषणाला पात्र नाहींत ज्यानां दुःख होणार नाहीं ते पात्र आहेत इतकें लिहिलें ह्मणजे पुरे होईल. आमच्यांतील कित्येक सुशिक्षित चार चार

दहा दहा देशांच्या इतिहासांत पारंगत असतील पण आपल्याला काय केलें पाहिजे ? इतकाही प्रश्न कोणी आपल्या मनाला केला नसेल. कोणी केला असेल तर त्यांणी प्रश्नोत्तराचा आरंभ स्विकारला नसेल. आरंभ केला असेल तर त्याचा आरंभ आणि शेवट हीं अगदींच जवळ जवळ असतील. मिळून उपयोगाच्या दृष्टीनें कांहीं नाहीं. असेंच सिद्ध होईल. पर्यायानें जास्त लिहिण्याचें कारण इतकेंच आहे कीं, आमच्या देशांत जंगल होतें किती ? त्याची तोड कोणत्या प्रमाणांत आहे? त्याच्या वृद्धीचे उपाय काय सुरू आहेत ? या तोडीमुळें आमचें कसें कसें नुकसान होतें ? याचा कोणी विचार केला असेल आणि त्याच्या निवारणाचे उपाय योजिले असतील; असे मनुष्य आमच्या या २९।३० कोटी वस्तीच्या देशांत हाताच्या बोटांवर मोजतां येतील इतके असतील कीं नाहीं याची शंकाच आहे. कांहीं लोकांच्या मनांत हे विचार घोळत असतील परन्तु " उत्पद्यंते विलीयंते दरिद्राणां मनोरथः " या उक्तीप्रमाणें त्यांचे विचार मनांतल्या मनांतच जिरून गेले असतील ! मिळून सारांश इतकाच कीं, जंगलाच्या तोडी पासून आमचें नुकसान किती होत चाललें आहे आणि त्या नुकसानीचा प्रतिबंध कसा करावा ? या विषयीं कोणीही कांहींच उद्योग केलेला दिसत नाहीं. अलिकडे शेपन्नास वर्षांत पावसाचें मान कमी कमी होत येऊन तें

हल्लीं इतकें कमी झालें आहे कीं, सुमारें एक दोन वर्षांत तें ४० इंचावर येऊन बसेल अशी भीती वाटत आहे. खेडींपाडीं व गांवें ह्यांच्या जवळपास जेथें दिवसास वाघ डुरकावयाचे इतकें जंगल होतें तेथला बहुतेक प्रदेश उजाड झालेला आहे. फार कशाला ? वाघ पाहण्याच्या ऐवजीं आह्मास आतां वाघाचें चित्र पाहण्याची पाळी आली आहे. ज्या दऱ्याखोऱ्यांतून, खिंडींतून व घाटांतून भर दिवसास शेंपन्नास लोकांनां जाण्याची पंचाईत पडत असे. त्याच वाटेंतून एकटा दुकटा मनुष्य पाहिजे तेव्हां जाऊं येऊं शकतो. इतकें आपल्या इकडील जंगल तुटलेलें आहे. जंगल तुटलें तें तुटलें परन्तु नवीन जंगलही वाढत नाहीं. इतकेंच नव्हे तर पाण्याचे झरेही बंद होत आहेत. या मुळें दिवसें दिवस जंगल वाढविण्याची इच्छा-ही निष्फळ होऊं लागते. जंगलांत पाऊस पुष्कळ पडतो हें पुष्कळ लोकांनां अप्रत्यक्ष अनुभवावरून माहीत आहेच! सगळ्यांनां पाहतां येईल असें एक उदाहरण व्यक्त करितों म्हणजे या मुद्याचें विवरण चांगलें लक्ष्यांत येईल. चर्नीरोड स्टेशनावरील गार्डन् मध्यें फिरावयास गेलों असतां वाळू आणि त्याच्याजवळ गवत असे देखावे आपल्या पुष्कळ दृग्गोचर होतील. थंडीच्या दिवसांत सकाळीं उठून वरील देखाव्याकडे नजर फेंकली असतां गवतावर दहींवर व वाळू कोरडी असें दृष्टीस पडेल. हाच मासला पावसाचा आहे असें दृष्टांतानें

समजावें. तात्पर्य—आमच्या देशांतील जंगल उत्तरोत्तर कमी कमी होत चाललें आहे त्या मानानें पाऊसही कमी कमी पडत आहे. आणि त्याचा परिणाम सुमारें प्रति-वीस वर्षी मोठा दुष्काळ आणि प्रतिवर्षी थोडथोड्या भागांत दुष्काळ असा झाला आहे. असाच क्रम आ-णखी कांहीं वर्षे चालला तर केवढा भयंकर प्रसंग ओ-ढवेल याची कल्पनाही करितां येत नाहीं. यावरून पाहतां जंगलाची तोड हें हल्लींच्या दुष्काळास मुख्य कारण आहे.

**शेतकऱ्यांची निकृष्टावस्थाः**—गेला दुष्काळ स-र्वत्र हिंदुस्थानांत पडला होता यामुळें व्यापारोपयोगी साधनें जीं सडकांचे रस्ते, आगगाडीचे रस्ते व जलमा-र्गांतून जाणारीं जहाजें तीं गेल्या दुष्काळांत मुळींच उप-योगी पडलीं नाहींत. हीं साधनें फक्त देशाच्या लहान-शा भागांत दुष्काळ पडला असतां धान्याचा पुरवठा धान्य उत्पन्न झालेल्या प्रांतांतून लवकर आणि कमी ख-र्चानें नेण्याचीं हीं साधनें आहेत. या साधनांचा फैलाव जितका होणें आवश्यक आहे तितका झालेला नाहीं. हिंदुस्थानांत रेल्वे कायती सुमारें १८०० मैल लांबीची आहे. सडकांचे रस्ते सर्व देशभर तयार झालेले आहे-त. या देशाचा दक्षिणेकडील द्विपकल्पांचा भाग गलबतें जाण्या येण्याला सोयस्कर असा आहे. बंगाला आणि सिंध या प्रांतात भागीरथी आणि सिंधु यांतून गलबतें येण्याजाण्याचे मार्ग बरेच दूरवर चालू आहेत. तेव्हां

दुष्काळाच्या वेळीं उपयोगी पडणाऱ्या या तीन साधनांपै-कीं सडका आणि गलबतांचे मार्ग हे बरेच मुबलक तयार आहेत. देशाच्या विस्ताराच्या मानानें पाहिलें असतां आगगाडीचे रस्त्यांचा प्रसार जितका व्हावयास पाहिजे तितका झालेला नाहीं. तरीही तिन्हीं साधनें देशांतील एखाद्या भागाचा दुष्काळ निवारण्याला पुरेशीं आहेत असें म्हटलें असतां चिंता नाहीं परन्तु मोठी अडचण काय ती धान्याची विपुलता ही होय ! आमचा देश पृथ्वीवरील अत्युत्तम सुपिक देशांत पहिल्या प्रतीचा सु-पिक आहे असें म्हटलें असतां अप्रासंगिक होणार नाहीं. परन्तु शेतकरी वर्गाची स्थिती अत्यंत वाईट आहे. अशी स्थिती कां असावी बरें ? असा प्रश्न केल्यास त्यास हेंच उत्तर आहे कीं, आमचे बहुतेक शेतकरी अशिक्षित आहेत व शास्त्रीयरित्या शेतकीची * सुधारणा कशी करावी याची कल्पनाही त्यांनां नाहीं. कालव्यांचा आणि खतांचा उपयोग कांहीं ठिकाणीं ज्यांनीं केले त्या ठिकाणीं मात्र —अगदींच थोड्या भागांत—शेतकीच्या धंद्याला थोडेसें रूप आलेलें आहे. खत आणि पाणी ह्यांची योग्य पुर-वणुक केली असतां पूर्वीच्या अडीचशेंपट जमिनीचें उ-

---

* हल्लीं शेतकी विषयावर ' कृषिकर्मविद्या ' नांवाचें पुस्तक व ' शेतकरी ' मासिक पुस्तक उत्तम रीतीनें लेख प्रसिद्ध करिता-हेत व केले. करितां सर्व शेतकऱ्यांनीं याचा अवश्य संग्रह करावा. शेतसुधारणेच्छुनीं तर ही आपल्या सुधारणेंत भरच घालवी.

त्पन्न वाढल्याचें शेतकरी मासिक पुस्तकांत एकदां प्रसिद्ध झालेलें आहे. पण अशा जमिनींत आणि असे उद्योग "खंडीमध्यें ही एक पावरती" या प्रमाणेंच आहेत. हिंदुस्थानची जमिन खरी सुपिक आहे एवढ्याच तत्वावर सरासरी देशांतील लोकांचा दोन वेळेपुरता उदरानिर्वाह लागण्याइतकें धान्य उत्पन्न होऊं शकेल. परंतु शेतकरीवर्ग अत्यंत दरिद्रावस्थेप्रत पोंचल्यामुळें शेत लावल्या बरोबर धान्याची साठीं ठरून उत्तम उत्तम धान्य तेवढें बाहेर देशीं जातें. यामुळें बारामहिने काबाडकष्ट करून शेतकऱ्याच्या घरांत दोन महिन्याचेंही निर्वाहाचें साधन रहात नाहीं. कर्जवाम उचापत थोडीशी कमी करून महिन्यादोन महिन्या पुरतें जें धान्य शिल्लक राहील त्यांच्यावर थोडे दिवस घालवून पुनः उचापतीला सुरवात होणारच! सारांश दलदलींतून वर निघण्याकरितां प्रयत्न करणारा मनुष्य जसा उत्तरोतर खालीं जातो; तद्वत्‌च आमचा शेतकरी वर्ग दिवसें दिवस अगदीं निकृष्टअवस्थेंत गढत चालला आहे. जमिनीची खत मसाला घालून मशागत करावी किंवा विहीर वगैरे खणून थोडेसें जास्त उत्पन्न काढण्याचा प्रयत्न करावा. या करितां शेतकऱ्याजवळ बिलकूल पैसा रहात नाहीं. कांहीं कांहीं जमिनी फार चांगल्या असून याच कारणामुळें वर्षाऋतूंतलें पिक काढून घेतल्यावर त्या आठ महिने ओस राहतात. अशाच कारणांनीं जमिनी चांगल्या असूनही कांहींएक उपयोग होत.

नाहीं म्हणून दुष्काळाला आदी कारण जसें जंगलाची तोड आहे तद्वतच शेतकऱ्यांची निकृष्टावस्था ' हें एक महत्वाचें कारण आहे.

**उधळेपणा**:—अलिकडे शेतजमीन वाढल्या प्रमाणवर आहे. लोक संख्येचें मान त्या प्रमाणानें वाढलेलें नाहीं असें असून हिंदुस्थानांत दुष्काळ कां पडावा? हा फार महत्वाचा प्रश्न आहे. आणि त्याचा निकाल करणेंही बरेंच कठिण आहे. शंभर वर्षापूर्वी शेतकीकडे जितकी जमीन गुंतलेली होती त्याचे दुपटीजवळ जवळ शेतजमिन झाली असून धन्याचा तोटा शेंकडों पटीनें पडावा हें एक मोठें चमत्कारीक कोडें आहे. सन १८७७ । ७८ सालच्या दुष्काळांत फक्त दोन तीन जिल्ह्यांमध्यें साडेबावनलाख मनुष्यें मेलीं हें लक्षांत आलें म्हणजे अंगावर रोमांच उभे रहातात! मग सन १८९७।९८ च्या म्हणजे गेल्या दुष्काळांत—पुनः तो सार्वत्रिक पडला असतां—किती बळी पडले असतील बरें? परन्तु समाधानाची गोष्ट इतकीच कीं, इतकी भयंकर प्राणहानी झाल्याचें सरकारनें कोठेंही प्रसिद्ध होऊं दिलें नाहीं; इतकेंच नव्हे तर एखाद्या वृत्तपत्रानें मनुष्य मेल्याचें प्रसिद्ध केलें असतां तो अमक्या रोगानें मेला असें प्रतिपादन करण्यांत येई सरकारच्या मतानें तर दुष्काळच पडला नव्हता परन्तु " मारून मुटकून मुसलमान " करणें आमच्या सरकारास भाग पाडलें. सरते शेवटीं ' तुमनाच दारू तुमनाच भात

देखो हमना नाच ' या म्हणी प्रमाणेच कृपण सरकारनें आमचें रक्षण केलें. अस्तु. पूर्वींच्या पेक्षां मनुष्य संख्या फार वाढली नाहीं, म्हणण्यासारखा जमिनीच्या उत्पन्नांत फरक पडला नाहीं, शेतकीकडे लागणारी जमीन दुप्पट झाली. एवढ्या गोष्टी आनुकूल्य असतां आमची स्थिती निकृष्टच ?? तेव्हां आमच्यांतच कांहीं तरी व्यंग असलें पाहिजे. तें व्यंग कोणतें ? याचा विचार केला तर असें सिद्ध होतें कीं, आमच्यांत उधळेपणा फार वाढला आहे, आमच्या घरांत जांगीळ मामाचा बाजार पुष्कळ पसरला आहे. साधारण सुखवस्तु मनुष्याचे हल्लींचे कपडे आणि अशाच स्थितीच्या शंभर वर्षां पूर्वीच्या मनुष्याचे कपडे ह्यांत पुष्कळच मिजाशीचा व उधळेपणाचा प्रकार दिसून येईल ! वस्त्रांप्रमाणेंच इतर गोष्टींचा विचार केला तर ज्याचा उपयोग थोडा पण ऐषआराम व मिजास मात्र फार असे पदार्थ आपल्या घरांत पुष्कळच सांपडतील ?? साक्रेतिस एकदां बाजारांतून चालला होता तेव्हां सभोंवतालच्या दुकानांतील पदार्थांकडे पाहून म्हणाला कीं, हे इतके पदार्थ येथें पसरले आहेत यांची मला बिलकूल जरूर नाहीं ह्या एवढ्या लहानशा उद्गारांत किती तरी व्यापक अर्थ आहे बरें ! अहो ! बाजारांत दिडकीला हत्ती मिळतो; घ्यावा कीं नाहीं ? या प्रश्नाचें उत्तर ठेंच लागल्याशिवाय बिनचूक देणारे थोडकेच सांपडतील ! हत्तीला किंमत अतिशय

कमी पडली खरी पण तो घरीं आणल्यावर त्याला रहा-
ण्याला साधारणशी जागा आणि अर्धे पोटच खाणें या-
चा विचार आम्ही कोठें केला आहे ! नाल सांपडल्या
बरोबर घोडा घेण्याची तयारी आम्ही करणार!! सारांश
आमची मितव्ययीपणाची वर्तणूक नाहींशी झाली, बाह्य
झळफळीचा पगडा आमचेवर बसला, आवश्य अनावश्य
याचा विचार समूळ गेला, मिळून आमच्या इच्छांनां ता.
रुण्यावस्था आली ! मागचा पुढचा विचार न करितां
आमच्या हातांत पैसा असला कीं खर्च झालाच !!
त्यांत प्रस्तुतचा काळ तर पूर्ण स्वातंत्र्याचा ! यामुळें
प्रत्येक व्यक्तिला स्वातंत्र्य आलें. अशा रीतीनें ज्यानें
या तीन गोष्टी गृहीत धरल्या त्यांच्या ठिकाणीं अविचार
सहजच आहे. मग—

**यौवनंधनसंपत्तीः प्रभुत्व म विवेकता ॥**
**एकैक मप्यनर्थाय किमुयच चतुष्टयम् ॥**

या चतुष्टयांत सांपडल्यावर दुष्काळच काय पण या
पेक्षांही भयंकर संकट परंपरा आमच्यावर ओढवेल !
अस्तु. ' रात्र थोडी आणि सोंगें फार ' अशांतली स्थि-
ती झाली मुख्य मुख्य कारणें शोधित असतां त्यांची
संख्या बरीच वाढली. आणखी शतशः कारणें दुष्का-
ळाला आहेत असें शहाजोग रितीनें दाखवितां येईल.
परन्तु कितीही व कोणचींही कारणें दुष्काळाला आहेत

असें दाखविलें तरी तीं वरील सत्पकांतीलच असावया-चीं! आतां या दुष्काळाचा प्रतिकार लोकांनीं कसा करावा ह्याचें यथानुक्रमें विवेचन करावयाचें आहे.

---

# भाग २ रा.



## हिंदुस्थानांतील दुष्काळांचीं कारणें टाळण्या-विषयीं लोकांची आद्य व मुख्य कर्तव्यें.



नयत्रस्थेमानं दधुरति भयभ्रांत नयना ॥
गलद्दानोद्रेक भ्रमदलि कदंबाः करटिनः ॥
लुटन्मुक्ता भारे भवतिपर लोकंगतवतो ॥
हरेरद्यद्वारे शिवशिव शिवानां कलकलः ॥'भामिनी'

दुष्काळ पडण्याचीं मुख्य व गौण कारणें कोणतीं याचें विवेचन पहिल्या भागांत अल्प व यथामतीनें केलें. या भागांत दुष्काळाचीं कारणें टाळण्यास लोकांनीं काय केलें पाहिजे याचा विचार कर्तव्य आहे. दुष्काळ प-डण्याला जीं कारणें दाखविलीं तीं नाहींशीं झालीं म्हणजे दुष्काळ न पडण्याला साधारणतः उपयोग होईल. इतकें सांगितलें म्हणजे या भागाची परिसमाप्ती झाली असें कोणी ह्मणतील. परंतु तीं टाळावीं कशीं याचा निर्णय कोणी करावा? असो आम्ही वर जो साधारणः उपयोग असा शब्द वापरिला आहे तो काय म्हणून? असा एखा-द्यानें प्रश्न केल्यास त्याचें उत्तर हेंच कीं, इ. स. १३९६

मध्यें हिंदुस्थानांत प्रसिद्ध बारा वर्षें जो दुष्काळ पडला होता तो कां पडला? त्या वेळीं हिंदुस्थानांत जंगल विपुल होतें निदान महाराष्ट्र देशांत तरी तें होतें असें असतां दुष्काळ कां पडावा म्हणजे पाऊस कां न पडावा? सारांश—अपायास उपाय किंवा कार्य वा कारण असतां कारण वा कार्य यांचा परस्पर भावसंबंध पाहाणें हें आपलें आद्य कर्तव्य होय. हैद्रोजन आणि आक्सिजन या दोन वायूंपासून पाणी होतें असें पुष्कळांनां माहीत आहे पण हे दोन वायू एखाद्यापाशीं आणून दिले आणि पाणी तयार करण्यास सांगितलें तर तें त्याच्यानें होईल काय? तद्वत्च साखर ही कारबान आणि आक्सिजन व हैद्रोजन या तीन मूलतत्वरूप द्रव्यांपासून उत्पन्न होते. पर हीं तीन मूलतत्वरूप द्रव्यें निरनिराळ्या प्रमाणांत घेऊन पाहिजे तितकी खटपट केली तरी त्यांपासून साखर उत्पन्न होत नाहीं. निरनिराळे शेंकडों पदार्थ उत्पन्न होतात. तात्पर्य—कारणांची सामुग्री यथास्थित करणें हें आपलें कर्तव्य आहे. कार्य घडणें हें केवळ ईश्वरावर अवलंबून आहे. एवढें मात्र खरें आहे कीं, कारण असतां कार्य घडण्याचा संभव आहे. कारण नसलें तर नव्याण्णव हिश्शानें कार्य घडणार नाहीं. सृष्टी व्यापाराचें यथास्थित ज्ञान आपणांस कितीही झालें तरी तीं कार्यें घडून आणण्याचें ज्ञान किंवा शक्ति आपल्या ठिकाणीं नाहीं म्हणून कार्यें

साधून त्यांच्या कारणांची तयारी करणें हें आपलें कर्तव्य आहे एवढ्याच दृष्टीनें आतां ह्या भागांत विवेचन करावयाचें आहे. दुष्काळ पडण्याला पहिल्या भागांत आम्हीं जीं कारणें निर्दिष्ट केलीं त्यांतील अनावृष्टी—झाडांची तोड—व्यापारवृद्धी—च्या साधनांची कमतरता, अदूरदर्शित्व—कमीपोंचपणा—आणि शेतकऱ्याची निकृष्टावस्था, यां खेरीज बाकीच्या कारणांचा प्रतिकार आपल्या हातचा नाहीं म्हणून निर्दिष्ट केलेल्या चार मुद्यांचाच आपले कर्तव्यकर्मांत विचार करावयाचा आहे. अनावृष्टी न होण्याकरितां जंगलाची समृद्धी असली पाहिजे असें मागें दाखविलेंच आहे ह्मणून अनावृष्टीचा विचार करतेवेळीं जंगलाची वाढ कशी व्हावी याच मुद्याचा विचार केला पाहिजे.

आमच्या देशांत हल्लीं सुमारें २८ कोट लोक आहेत. इतक्या लोकांचे खाण्याचे पदार्थ शिजविण्याकरितां अगदीं कमींत कमी प्रमाणानें तरी लहान मोठीं दहाहजार झाडें प्रतिदिवशीं; तुटत; असतील यामानानें रोज सर्पणायोग्य अशा दहाहजार झाडांची लागवड होत असेल किंवा नाहीं याची मोठीच शंका आहे ! मनुष्य प्रयत्नानें तर ही होत नाहींच असें खात्रीनें म्हणतां येईल. झाडांचीं फळें जमिनीवर पडून त्या पासून जळाऊ लांकडें बनण्याची स्वाभावीक क्रिया काय चालत असेल तेवढी ! जळाऊ लांकडें तयार झालीं पाहिजेत या दृष्टीनें कां न

होईना परन्तु फलवृक्ष म्हणून किंवा उपयुक्त वृक्ष म्हणून अशा कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी दर रोज १०००० झाडांची लागवड खचित होत नसेल ! जितक्या झाडांची तोड होते त्याचा दशांशही जर लागवड होत नाहीं. तर पूर्वींचीं झाडें आम्हाला किती दिवस पुरणार ? हा आमचा अविचारीपणा किती दिवस चालेल तें कळत नाहीं. एक झाड तोडावयाचें म्हणजे दहा झाडें लावावयाचीं असा जर सक्तीचा नियम केला तर कदाचित शें-पन्नास वर्षांनीं जंगलाची थोडिशी वाढ होईल. नुसतें झाड लावून त्याची इतिकर्तव्यता होत नाहीं. तर तें दोन तीन वर्षे तरी पाणी घालून वाढविलें पाहिजे. जेथें जंगल दाट असतें तेथें झाडांचीं फळें पडून नवीन झाडांची वाढ पाण्यावांचून स्वाभाविक होते. कारण सावलीमुळें नविन रोप्यांचा उन्हाचे तापापासून बचाव होतो. व मोठ्या झाडांचे मुळांपाशीं पाणी आपोआप सांचून रहात असल्यामुळें पाण्याचाही पुरवठा होतो. परन्तु आतां अशीं जंगलें कोठेंही राहिलीं नाहींत. हिमालया सारख्या पर्वतावरही आतां नवीन झाडें उत्पन्न होत नाहींत; म्हणून प्रत्येक मनुष्यानें झाड तोडते वेळीं किंवा जळवण विकत घेते वेळीं नेहमीं मनांत बाळगिलें पाहिजे कीं, दरसाल माझे पोटाकरितां एक झाड तरी वर्षास लागतें. तेव्हां मी आपल्या मुलांबाळां करितां निर्वाहाचा जसा कांहीं संचय

करितों तद्वत किंबहुना बिनखर्चाचें म्हणून जास्त प्रमाणानें दरसाल १० झाडांची तरी लागवड करीन आणि हें करणें मला अत्यंत आवश्यक आहे. अशीं झाडें लावण्याकरितां जमिनीच्या मालकीचा वगैरे आकुंचित विचार मनांत आणितां कामा नये. या झाडांना पाणी घालण्याची तजवीज करण्यासाठीं एक दिडकीचाही खर्च नको. मनुष्याच्या दिनचर्येला लागणारें पाणी जर एका वेळचें एका झाडाला याप्रमाणें वांटून दिलें तर चार रोप्यांचा निर्वाह एका मनुष्याचे हातून सहज होऊं शकेल; अशा रीतीची प्रत्येक मनुष्यानें जर व्यवस्था केली तर थोड्या दिवसांचे आंतच हिंदुस्थानदेश म्हणजे एक उत्तम प्रकारचा बगीचाच बनून जाईल. ‘ मनपर धरेंगा तो बारा बाघ मारेंगा ’ अशा पैकींच कांहीं अंशीं ही कल्पना आहे. परन्तु हा उत्तम उपाय आहे; याकरितां या विषयांत याला पहिल्यावर्गांत घालणें भाग पडलें. जंगल वृद्धिच्या योगानें, ज्या ठिकाणीं पाऊस पडत नसे त्या ठिकाणीं पाऊस पडावयास लागल्याचीं प्राचीन काळचीं उदाहरणें इतिहासज्ञांस माहीत आहेतच आणि या संबंधानें अल्प वर्णन पहिल्या भागांत केलेंच आहे.

**दुसरें कर्तव्य**—व्यापारोपयोगी साधनांची कमतरता हें होय. हीं साधनें म्हणजे आगगाडीचे व सडकांचे रस्ते हीं मुख्य आहेत. ह्या साधनांपासून आमचे फायदे

कोणते आहेत? या प्रश्नाचा जबाब देणारा मनुष्य आमच्यां देशाचा वरवर विचार करणारा, तसाच ' वसुधैव कुटुंबकम् ' अशांतला साधू किंवा तत्ववेत्ता उपयोगाचा नाहीं; तर आपल्या देशाचा सूक्ष्मपणें विचार करणारा, आपल्या देशाची पूर्ण स्थिती जाणणारा व हुशार असा पाहिजे. अशा मनुष्यास वरील प्रश्न विचारल्यास तो असें म्हणेल कीं, आमच्या देशांत आगगाड्या आणि सडका झाल्यापासून खरोखर कांहींच फायदा नसून तोटाच आहे, कारण आमची कितीक तरी सुपिक जमीन ह्या द्वयींनीं अडवून टाकिली आहे! या रस्त्यांमुळें ९ कोट प्रजेचा निर्वाह चालेल इतकी जमीन तरी खास अडली गेली असेल! तेव्हां या रस्त्यांपासून आमचा काय फायदा झाला आहे? रेल्वे मास्तरांस पगार मिळून त्यांचा कोठें चरितार्थ चालावयाचा तो त्यांस कंपनीनें—संपकरून आपले योग्य हक्क मागितले म्हणून—अव्हेरून टाकिलें. यावरून इकडील बाजुसही तोटाच! आगगाड्या, सडका, तारायंत्रें हीं देशांत पाहिजे आहेत किंबहुना शरिरांत जशा शिरा तसेच सर्व देशांत आगगाडीचे रस्ते असले तर शरीराच्या प्रत्येक भागाला शिरांनीं जशी पुष्टी येते तशी देशाला व्यापाराच्या योगानें पुष्टी येईल. होय; हें मत अगदीं खरें आहे. शरीर मोठें आहे, रक्तवाहिन्या सर्व शरीरभर पसरल्या आहेत काय पंचाईत ती रक्ताचीच! अशा देहाला जशा रक्तवाहि-

ऱ्या निरुपयोगी त्याप्रमाणेंच आमच्या देशांत खरा व्या-
पार मुळींच नसल्यामुळें आम्हाला आगगाड्यांचे व सड-
कांचे रस्ते उपजीविकेची जमिन अडविणारे असेच वा-
टतील. दुष्काळाच्या प्रसंगीं एकाद्या भागांत दुष्काळ
पडला असतां दुसऱ्या भागांतून धान्य लवकर आणण्या-
ला आगगाडीची मदत चांगली होते हें खरें ! इतक्याच
दृष्टीनें आज आमच्या देशाला आगगाडीचा काय उपयो-
ग होईल तो होवो ? खरें पाहिलें तर ज्या देशांत व्या-
पार धंदा मोठा चालतो, यंत्रानें माल तयार होतो, त्या
देशाला आगगाडीचा उपयोग आहे. आमच्या देशांत
व्यापार मुळींच नाहीं, यांत्रिक जिन्नस मुळींच तयार
होत नाहींत, आमच्या देशाला व्यापाराचें गिऱ्हाईक नाहीं-
च म्हटलें तरी चालेल. तेंव्हां अशा देशांत आगगाड्या,
तारायंत्रें, शिवण्याचीं यंत्रें, गिरण्या यांचा खरोखर कांहीं
उपयोग नाहीं. कांहींकांनां ही गोष्ट नापसंत होईल
पर प्रथमतःच आम्ही असें लिहिलें आहे कीं, आमच्या
देशाची परिस्थिती काय आहे ? ह्याचा सूक्ष्म विचार
ज्यांनीं केला आहे त्याला ही गोष्ट पटल्या शिवाय रहाणार
नाहीं. आगगाडी सारखें साधन असल्याच्या योगानें
जितके फायदे आहेत त्यापेक्षां दुष्काळ या दृष्टीनें विचार
करीत असतां आमचे तोटेच फार आहेत. पुण्याजव-
ळच्या किंवा नागपुरच्या बागेंतील फुलें संध्याकाळीं आ-
गगाडींत भरून सकाळीं पांच वाजले नाहींत तोंच मुंब-

ईस येऊन माळ्याच्या घरीं पडतात व तेथें त्या फुलांच्या पुड्या तयार होऊन ६ वाजले नाहींत तोंच रामभटजीं-च्या घरीं या फुलांची पुडी येऊन पडते. आणि मग रामभटजी—

' मयाहृतानि पुजार्थं पुष्पाणी प्रति ग्रिह्यताम '

असें म्हणून मोठ्या आनंदानें आगगाडीचा महिमा वर्णन करीत करीत खुशाल फुलें वाहतात ! पण भटजी बोवा ! जेव्हां तेव्हां रेल्वेच्या संबंधानें जो पैशाचा चुराडा होतो आणि व्यायाम न घडल्यामुळें शरीराचा जो नाश होतो त्याचा तुम्ही आगगाडीचा महिमा वर्णितांना विचार केलात काय ! तारांवर तारा खेळल्या पाहिजेत, दिवसांत २०० कोस पल्ला खेटला पाहिजे अशी कोणची नफ्याची बाब आज अडली आहे ! साधनच असलें म्हणजे लहानसहान प्रसंगीं सुद्धां त्याचा उपयोग करावा असें मनुष्याला वाटतें; हीं साधनें नसलीं तरी विशेष अडचण पडते असें नाहीं. मनुष्याला सौख्य साधनेंहि पाहिजेच आहेत. तात्पर्य— दुष्काळ निवारण्याला दुसरें साधन जें व्यापारोपयोगी साधनें तीं जितकीं आहेत त्यां पेक्षां जास्त वाढविणें क-रितां लोकांनीं खटपट करावयास नको.

**तिसरे कर्तव्य**—अदूरदर्शीत्व हें आहे. पहिल्या भागांत या गोष्टीं विषयीं बरेंच विवेचन केलें असल्या-मुळें पुनः पुनः पुनरावृत्ती करणें हास्यास्पद होईल. या-स्तव येथें इतकेंच दर्शीत्व केलें म्हणजे पुरे आहे कीं,

" ज्या वस्तूंचा आपल्यास कांहींएक उपयोग होत नाहीं त्या वस्तुसाठीं व्यर्थ पैसे खर्च न करितां नेहमी मितव्ययीपणा ठेवावा. "

**चवथें कर्तव्य**—शेतकऱ्यांची निकृष्टावस्था हें आहे. हिंदुस्थानांत शेंकडा नव्वद लोक शेतकीकडे गुंतलेले आहेत. हे शेतकीचा धंदा किफायतीचा आहे म्हणून किंवा शास्त्रीय रीतीनें शेतकीची सुधारणा करण्याकरितां म्हणून शेती करीत नाहींत. असा आम्हांस अनुभव आहे. दुसरा धंदा नसल्यामुळें भूमातेची कशी तरी चाकरी करून चार महिने पोटाची भर करण्याकरितां हे शेती करितात. इतके लोक जरी या धंद्यांत गुंतलेले आहेत तरी पूर्वीपेक्षां देशांत जास्त धान्य उत्पन्न होत नाहीं. आमच्या देशांतून कोट्यावधि खंडी धान्य परदेशांत जातें; हा एक प्रकारें व्यापाराच्या दृष्टीनें वर वर फायदा दिसतो. कारण दुष्काळासारख्या भयंकर प्रसंगीं जास्त किंमत पडून कां होईना पण धान्य मिळत नाहीं. कारण कोणीही धान्याचा सांठा करीतच नाहीं. पूर्वी जमिनीचा सारा शेतांत उत्पन्न होणाऱ्या जिनसाच्या रूपानेंच घेतला जात असल्यामुळें देशांतल्या देशांतच धान्य वगैरे जिन्नस रहात असत. शिवाय कांहीं सुख वस्तु सावकार व शेतकरी यांची रीत अशी असे कीं, कसाही दुर्धर प्रसंग येवो! पेस्तर सालचें धान्य दृष्टीस पडल्याशिवाय पूर्वीचें धान्य विकावयाचेंच नाहीं. परंतु

तो काळ आतां गेला ! चार खंडी धान्य शिल्लक राहिलें कीं गिऱ्हाइकाची वाट पहाण्यास सुरवात झालीच. एकदां पैसे हातांत पडले कीं झालें काम ! पण पुढील सोईकडे बिचाऱ्याचें बिलकुल लक्ष नाहीं. पैवें म्हणजे त्यास मोठी अडचण !! काय सांगावें ? जों शेतांतील धान्य उभें आहे तोंच धान्याची सांठी ठरून निकाल ! शेत पिकतें केव्हां आणि तें आणून मळून खातों केव्हां अशीही शेतकऱ्यांची स्थिती आहे. मग संग्रहाची गोष्ट कशाला ?

शेतकरी वर्गाची एकंदरीनें पाहतां दिवसें दिवस अत्यंत निकृष्टावस्था होत चालली आहे. वर्षभर सर्व कुटुंबानें मेहनत करावी, सरासरी चार महिनेपर्यंत ओढाताण करून पोटाला खावें. पुनः कर्जाला सुरुवात आहेच ! वर्षाकाठीं एखादी घोंगडी, धोतर, दोन तीन रुमाल आणि बायकोला एखादें लुगडें याला सुद्धां कर्ज काढावें लागतें. तात्पर्य—वर्षभर खपून अर्धिमुर्धी सावकाराची फेड करावी तों महिन्या दोन महिन्यांतच पुनः कर्जाला सुरवात होणार ! तशांत एखादा लग्नकार्याचा किंवा दुर्दैवानें अजारीपणाचा प्रसंग आला असतां असलें घराणें बहुतेक रसातळास पोंचतें. आज हिंदुस्थानांत शेंकडा ९० शेतकरी तरी अशा स्थितींत आहेत. यांचे सावकार अशाच मासल्याचे असतात. एका हातानें द्यावयाचें आणि दुसऱ्या हातानें पोंचतें करावयाचें ? मिळून शेत-

करी आणि सावकार यांची बहुतेक अंशीं स्थिती सारखीच आहे. जिवापाड मेहनत करून कर्ज मुक्त तर कोणी होत नाहींच. आम्ही म्हणतों अशाच स्थितींत एक वर्ष जास्त संकट सोसून प्रत्येकानें जर असा विचार ठरविला कीं, कांहीं होवो! वर्षाची पूर्तता ठेवावयाचीच!! —हा विचार बहुतेक मनांत मांडे खाण्यासारखाच आहे! —तर एखादें वर्ष दुष्काळ पडला असतां लाखों माणसें मरण पावतात, कोट्यावधी जनावरें मृत्युमुखीं पडतात. तसा प्रसंग सर्वांशीं प्राप्त होणार नाहीं. इ० स० १८७७।७८ चे दुष्काळांत ६२॥ लाख मनुष्यें अन्नान करून मरण पावलीं तशी स्थिती या उपायानें येण्याचा संभव कमी आहे. गेला दुष्काळ तर सर्व हिंदुस्थानांतच होता मग तेव्हांची मृत्युसंख्या किती बरें असावी! परन्तु आज पावेतों कोठेंही दुष्काळानें मनुष्य मेल्याचें बाहेर आलें नाहीं. येईल कशाला? दुष्काळ ठरेल तेव्हां मनुष्य मरेलना! असो. एकंदर शेतकऱ्यांची निकृष्टावस्था दूर करण्यास सावकार व कुळें ह्या उभयतांनींही तोटा सोसून प्रत्येकांनीं आपल्या जवळ दोन वर्षाचे बेगमी पुरता तरी धान्य संचय करावा म्हणजे असा भयंकर प्रसंग येण्याचा संभव कमी आहे.

---

# भाग ३ रा.

## हिंदुस्थानांतल्या दुष्काळास सरकारी कारणें कोणतीं ? व तत्प्रतिबंधनार्थ काय केलें पाहिजे ?

केव्हां सत्यवदे वदे अनृतही केव्हां वदे गोडही ॥
केव्हां अप्रियही दयालुही असे केव्हां करी घातही ॥
जोडी अर्थहि जें यथेष्टसमयीं कीं रेचहि आदरी ॥
ऐशी हे नृपनीति भासत असे वारांगनेचे परी ॥१॥

वामन--नीतिशतक.

गेल्या दोन भागांत दुष्काळ पडण्याचीं कारणें व तत्प्रतिबंधनार्थ लोकांनीं काय केलें पाहिजे याचें संक्षिप्त विवेचन केलें आहे. या भागांत दुष्काळ पडण्याला सरकारी कारणें कोणतीं व तत्प्रतिबंधनार्थ सरकारानें काय केलें पाहिजे याचा विचार कर्तव्य आहे.

पहिल्या भागांत दुष्काळाला शेतकऱ्यांची निकृष्टावस्था व लोकांचा उधळेपणा म्हणून जीं दोन कारणें सांगितलीं व तत्प्रतिबंधनार्थ दुसऱ्या भागांत जे उपाय सांगितले ते उपाय व योजना ह्यांचा आमच्या सद्यःस्थितिशीं विचार करावयास लागलें म्हणजे सखेदाश्चर्य वाटतें ! कारण ज्या वेळीं आम्हांस स्वतंत्रता होती किंवा आमच्या वर जेव्हां हिंदनिवासी राजे राज्य करीत होते त्या वेळीं

शेतकऱ्यांची निकृष्टावस्था कोठें होती ? तसेंच त्या वेळचे लोक मिजाशी करित नव्हते काय ? असे दोन प्रश्न उद्भवतात; व त्यांच्या पोटीं दुसरे दोन प्रश्न उद्भवतात कीं, इंग्लंड, जर्मनी इत्यादिकांप्रमाणें हिंदुस्थानची लोक संख्या वाढली नसतां व जमिनीचें उत्पन्न अडीचपट वाढलें असतां शेतकऱ्यांची निकृष्टावस्था कां व्हावी ? व आमच्या मिजाशीवरच दुष्काळ अवलंबून कां रहावा ? पहिल्यापेक्षां आह्मी म्हणजे आज जास्त मिजाशी करीत आहों अशी कांहीं स्थिती नाहीं. असें असतां दुष्काळाला आमच्या मिजाशीचें कारण कां लावावें ? या सर्व प्रश्नांचीं उत्तरें देणें मोठें कठीण आहे असें नाहीं. सर्व प्रश्नांचीं उत्तरें 'परकीय राजसत्ता' या अष्टाक्षरी मंत्रातच आहेत. स्वराज्य व परकीय राज्य यांतील भेद पाहूं लागलें म्हणजे वरील प्रश्नांचीं उत्तरें तेव्हांच लक्ष्यांत येतील. स्थायिक राजाला आपल्या प्रजेविषयीं प्रेम, त्यांचें हित, इत्यादिकांविषयीं किती काळजी असते व आपल्या प्रजेस संतुष्ट राखण्याकरितां त्यांचें चित्त किती व्यग्र असतें याची कल्पना सन १८९६।९७ सालच्या दुष्काळांत लार्ड एल्जिन साहेबांनीं आपल्या प्रजेच्या अन्नपाण्याबद्दल केलेली व्यवस्था कशी होती व होळकर, कोल्हापूरचे छत्रपती, शिंदे, गायकवाड इत्यादि संस्थानिकांच्या दुष्काळा वेळच्या केलेल्या व्यवस्था कशा होत्या हें पाहिलें असतां तेव्हांच

ध्यानांत येईल. परकीय राजा असला म्हणजे त्याचें चित्त आपल्या देशाचें कोणत्या प्रकारें हित होईल व हिंदुस्थानाप्रमाणें आमच्या देशास सुवर्णभूमी म्हणवून घेण्याचा प्रसंग कधीं येईल ह्यांत असावयाचें ? ह्याच भेदामुळें हिंदुस्थानांत वारंवार दुष्काळ पडावयास लागले आहेत. हिंदुस्थानांतील दुष्काळाचें सरकारी व प्रमुख कारण—

**अनियमित साऱ्याची पद्धती**—हें आहे. व्यापाऱ्याच्या मिषानें आमच्या सरकारनें ज्या वेळीं हिंदुस्थानांत पाय ठेविला त्याच वेळीं हिंदुस्थानांतील लोकांचे निकृष्ट स्थितीस प्रारंभ झाला. कोणत्याही दृष्टीनें विचार करा त्यांत म्हणजे सरकारी पैशाचा संबंध नाहीं अशी गोष्ट विरळा ! किंबहुना प्रत्येक गोष्टीला सर करणारें सरकार उभें आहेच ! कौरव पांडवांच्या वेळीं दुर्योधन पक्षाकडील लोक जांगीळ मामाच्या मायिक मालानें जसे व्यापून गेले होते तद्वत किंबहुना त्यापेक्षां कांकणभर जास्त अशा आंग्ल सुधारणा देवीच्या कपटी पुतळ्यानें आम्हांस घेरलें आहे. तुमच्या संरक्षणार्थ पोलीस किंवा लष्कर ठेविलें पाहिजे, तुमचे तंटे तोडण्याकरितां कोर्टें स्थापिलीं पाहिजेत, दुष्टांस वेळीं सज्जनांसही शासन करण्याकरितां मॅजिस्ट्रेट नेमिले पाहिजेत, प्लेग सारख्या भयंकर रोगाची सांथ नाहींशी करण्याकरितां हजारों डाक्टर व नर्सिसी विलायतेहून आणिले पाहिजेत. दुष्काळ निवारणार्थ इनकम टॅक्स ठेविला पाहिजे व दु-

ष्काळ आहे किंवा नाहीं हें ठरविण्याकरितां लाखोंशें रुपयांचा फन्ना उडविला पाहिजे. एवंच सर्व कांहीं पाहिजे आहे. नको असा कोणताच पदार्थ नाहीं. ही बाह्य स्थिती झाली पण अंतस्थ स्थिती ह्यापेक्षांही चमत्कारीक आहे. हिंदुस्थानचे तिजोरींतील शिल्लक विलायतेस पाठविण्याकरितां जो पैसा खर्च होतो, मिठावरील कर व जमिनीवरील धान्याची पद्धती हीं आमच्या निकृष्ट स्थितीस कशीं कारण होतात हें म्हणजे नव्यानेंच सांगावयास पाहिजे असें नाहीं. हरएक बाबतींत आमच्या निकृष्ट दशेला कारण होणारे पैशाचा सरकारी संबंध आहेच. दाद लागण्याकरितां करावयाच्या अर्जापासून तों तहत पिण्याच्या पाण्यापर्यंतही द्रव्यतृष्णा आहेच. अशा प्रकारची सरकारची द्रव्यतृष्णा असल्यामुळें आम्हांवर आज दुष्काळासारखे भयंकर प्रसंग यावयास लागले आहेत. शेतकऱ्याची निकृष्टावस्था होण्यास ही तृष्णाच कारण होय. शेतकऱ्यांवर जमिनीच्या साऱ्याचें ओझें फाजील पडल्यामुळें व दिवसेंदिवस त्याची सारखी वाढ होत असल्यामुळें त्याचे निकृष्ट स्थितीस पारावारच नाहींसा झाला आहे. सर्व * हिंदुस्थानांतील जमिनीचा सारा घेण्याची अनियमित पद्धती व तीपासून शेतकऱ्यांवर घडणारे परिणाम ह्याविषयीं पंधराव्या राष्ट्रीय सभेचे

---

* बंगाल शिवाय करून.

अध्यक्ष मि० रोमेशचंद्र दत्त ह्यांनीं कांग्रेसपुढें जें भाषण केलें तें अतिशय महत्वाचे असल्य'मुळें येथें दिलें असतां दुष्काळाला खरें कारण जमिनीवरील अनियमित धाराच आहे असें सिद्ध झाल्यावांचून रहाणार नाहीं.

**मिस्तर दत्त ह्मणाले**:—दुष्काळासारखा अत्यंत महत्वाचा विषय दुसरा कोणताच नाहीं. लोकांनां व संस्थानांना मदत करण्याविषयीं लॉर्ड कर्झन ह्यांनीं नुकतेंच अभिवचन दिलें आहे. १८७४, १८७६ व १८९६ या तीनही सालीं डिस्ट्रिक्ट ऑफिसर किंवा कमिशनर या नात्यानें मी रिलीफ कामें चालविलीं आहेत; आणि माझा पूर्ण भरवसा आहे कीं, रयतेस मदत करण्यास सरकाराकडून केव्हांही हयगय होणार नाहीं व अशा वेळीं उपयुक्त सूचना करून सरकारास योग्य मदत करणें हेंच राष्ट्रीय सभेचें मुख्य कर्तव्य आहे.

## दुष्काळाचीं कारणें.

—०:-*-:०—

हिंदुस्थानांतील रयत गरीब कां असावी, कर्जबाजारी कां रहावी, हा मुख्य प्रश्न आहे. कर्जबाजारीपणामुळें दुष्काळ पडतो असें नाहीं तर त्यामुळें दुष्काळ अत्यंत भासतो अशी स्थिती आहे. कर्जबाजारीपणा किंवा कंगालपणा, रयतेच्या कांहीं दोषांमुळें उत्पन्न होतो काय? असें सांगण्यांत येतें कीं, हिंदुस्थानची लोकसंख्या वाढत चालल्यामुळें रयत दरिद्री राहून दुष्काळ पडतो. खानेसुमारीचे कमिशनर मि० बेनस् यांनीं आपलें असें स्पष्ट मत दिलें आहे कीं, जर्मनी इंग्लंड वगैरे युरोपियन राष्ट्रांतून ज्या प्रमाणानें लोकसंख्या वाढत आहे. त्याहून हिंदुस्थानांतील वाढीचें प्रमाण कमी आहे. मग इंग्लंड व जर्मनी येथील रयत दरिद्री होत नाहीं, तर हिंदुस्थानांत एवढा कंगालखाना कोठून

यावा? शिवाय लागवडीच्या वाढीच्या प्रमाणाहूनही लोकसंख्ये-च्या वाढीचें प्रमाण कमी आहे. तेव्हां रयतेच्या कंगाल स्थितीचें कारण सांप्रतच्या लोकसंख्येचें वाढतें प्रमाण नसून दुसरें कोणतें तरी असलें पाहिजे. रयतेची उधळपट्टी, मूर्खपणा व अविचार हीं ही कारणें पुढें आणण्यांत येतात, पण त्यांतही कांहीं हांशील नाहीं. मी माझ्या अनुभवावरून असें स्पष्ट सांगतों कीं मितव्ययी, दुरदर्शी व आपल्या पुढील स्थिती संबंधानें विचार करणारे हिंदुस्थानांतल्यासारखे शेतकरी पृथ्वीवर दुसऱ्या कोठेंही सांपडणार नाहींत. सावकाराकडे जावें लागतें, ह्याचें कारण त्यांना कर्ज काढण्याची आवड नव्हे; तर तसें केल्याशिवाय त्यांना खावयासच मिळत नाहीं. दरसाल दर शेंकडा २२ किंवा ३७ टक्के व्याज भरण्याचें कारण असें की, याहून कमी व्याजानें पैसे मिळण्या इतकी त्यांची पतच नसते.

पंजाबांतील शेतकऱ्याची स्थिती सुधारण्या संबंधानें सरकार प्रयत्न करीत आहे हें आपणास माहितच आहे. तेथील शेतकऱ्यांची पक्की स्थिती मला माहीत नसल्यामुळें सरकारच्या सांप्रतच्या प्रयत्नाविषयीं मी कांहीं बोलूं इच्छित नाहीं; पण जमिन गहाण टाकण्यासंबंधानें किंवा विकण्यासंबंधानें जे अडथळे उत्पन्न करण्यांत येत आहेत त्या विरुद्ध मी आहे. बंगाल टेनन्सी बिलाच्या वेळीं असेच प्रयत्न करण्यांत आले होते. शेतकऱ्यांच्या ताब्यातून जमीन सावकाराकडे जात आहे. ही अधिकाऱ्यांची मुख्य तकरार आहे; व रयतेचे दारिद्र्य दूर करण्याचे खरे उपाय योजितां, रयतेनें मालमत्ता विकूं नये अशा प्रकारची मर्यादा तेवढी घालण्यांत येते. रयतेची स्थिती सुधारण्यास एकंदरीनें सरकारची रयतेशी वर्तणूक अशा प्रकारची असली पाहिजे कीं, त्या योगे रयतेस सुकाळाचे वेळेस काहीं तरी शिल्लक टाकितां येईल व दुष्काळाचे वेळीं इतरांची मदत मागण्याचा प्रसंग येणार नाहीं.

## दुष्काळाचें खरें कारण.

वर वर पहाणाराचे लक्षांतही दुष्काळाचें खरें कारण आल्यावांचून रहाणार नाहीं बंगाल व इतर कांहीं प्रदेश शिवायकरून बाकी सर्व ठिकाणी दुष्काळाचें खरें कारण ह्मटलें ह्मणजे जमिन धाऱ्याचे फाजिल ओझें होय. सारा फाजील असल्यामुळें सुकाळाचे वेळींही रयतेंपाशीं कांहीं शिल्लक रहात नाहीं व त्यामुळें दुष्काळातून पार पडण्यास रयतेपाशीं त्राण नसतो. अप्रतिबंध व्यापार तत्वामुळें इंग्रजी कारागिरापुढें व व्यापाऱ्यापुढें आमच्या कारागिरांचा व व्यापाऱ्यांच्या पुरा मोड झाला आहे; यामुळें खेडेगावांतील साळी, कोष्टी आदीकरून सर्व उद्योग धंदेवाल्यानां उदर निर्वाहार्थ शेतकीवरच अवलंबून रहावे लागते. कंजूष पणानें जमिनधारा ठरवून त्याचा वसूल जर करण्यांत आला नाहीं, व शेतकऱ्यांपाशीं कांहीं शिल्लक राहील अशाच तऱ्हेची जर सारा वसूल करण्याची पद्धत ठेविली तर पर्जन्याचे अभावामुळें पीकपाण्याची हवालदील झाली असतांही दुष्काळास ते बळी पडणार नाहींत.

## बंगालची जमिनदारी पद्धत.

हजारों वर्षांच्या प्रत्यक्ष अनुभवावरून हिंदु शास्त्रकारांनीं असें ठरविलें आहे कीं, राजानें करादाखल जमिनीपासून एकंदर उत्पन्नाचा एक-षष्ठांश भाग घ्यावा. हल्लिंच्या अनुभवानें पाहिलें असतां, वरील नियमच शहाणपणाचा ठरयो. १८५९, १८६८ व १८८५ सालचे बंगाल्यांतील जमिनींसंबंधाच्या कायद्यामुळें शेतकऱ्यांना सारा वाढण्याची तेथें भीती नाहीं. रयत जमिनदारांना एकंदर उत्पनाच्या एक-षष्टांस भागापेक्षां अधिक उत्पन्न देत नाहीं; पूर्वेकडील प्रांतांत तर हा भाग एक-षष्टमांशाहून कमी आहे; व ह्यामुळें बंगाल्यांत गेल्या शतकांत दुष्काळाचे उग्रस्वरूप केव्हाही दृष्टीस पडलें नाहीं. बंगालची पद्धत चहूंकडे सुरू करा; म्हणजे हिंदुस्थानांतील दुष्काळ कमी करण्याच्या प्रश्नाचा उलगडा झाला म्हणून समजा.

## वायव्य प्रांतांतील जमिनधाऱ्याची पद्धत.

वायव्यप्रांत व अयोध्या ह्या ठिकाणी जमीन धारा कायमचा केलेला नाहीं. प्रत्येक नवीन तपासणीचे वेळीं सरकारी वसुलाची वाढ होते. सर अँटनी मॅकडोनल ह्यांनीं करन्सी कमिटीपुढे साक्ष देतांना नंबर ५७३७ ते ५७४० ह्या प्रश्नांना उत्तर देतांना ह्या पद्धतीचे वर्णन केलें आहे. जमिनदारांना सरकार प्रथम रयतेशी आपापलें ठराव करण्यांस सांगते; व नंतर जमिनदाराच्या प्राप्तीपैकीं अर्धाभाग आपण घेते. जमिनीतील एकंदर उत्पन्नाचा एक पंचमांश भाग जमिनदार रयते पासून घेतात. अर्थात सरकारास शेकडा दहा टक्के पडतात ही पद्धत इतर ठिकाणाहून चांगली आहे खरी; पण दर तीस वर्षांनीं सरकार देणें वाढवून रयतेचाही कर वाढणार नाही अशी कांहीं तरी त्यांत व्यवस्था पाहिजे म्हणजे जमिनदाराला वीस टक्के व सरकारला त्यांतील दहा टक्के, नेदान या सीमेचे केव्हांही उल्लंघन होऊ देतां कामा नये.

## मद्रासची साऱ्याची पद्धत

मद्रासची स्थिती याहून फार वाईट आहे. सरकार व रयत यांमध्यें तेथें जमिनदाराचा वर्ग मुळींच नाहीं; व सरकार जमीन लागवडीचा खर्च वजा टाकून बाकी राहिलेल्या उत्पन्नांतील निम्मा भाग साऱ्या दाखल घेतें. अलीकडे या प्रश्नासंबंधानें बोबिलीचे राजेसाहेब ना० सुवाव आणि मि० व्यंकटरत्नम् या त्रिवर्गांचीं केलेलीं भाषणें आपणांस माहीतच आहेत. रयत जमिनींचा मालक असून सारा वाढविण्याचा अधिकार सरकारास नाहीं ही गोष्ट १८५७ सालीं सरकारनें कबूल केली. १८८२ सालीं लॉर्ड रिपन यांचे कारकीर्दीत तेंच वचन पुनः देण्यांत आलें. फरक इतकाच कीं, जमीन महसुलाची बाजारांतील किंमत ज्या प्रमाणानें वाढेल, त्या प्रमाणांतच सारा वाढविण्यास हरकत नाहीं. पण हल्लीं हीं वचनें एका बाजूस ठेवण्यांत येत आहेत बाजारांतील किमती वाढल्या ह्या एवढ्याच सबबीवर नव्हे;

तर जमिनीच्या मगदुराचीही फेरतपासणी झाली पाहिजे ह्मणून सारा वाढविण्यांत येत आहे. असें ठरविण्यांत आलें आहे कीं, खर्च वेच वजा जातां राहिलेल्या उत्पन्नाचा अर्धा भाग ह्मणून जो सरकाराकडून घेण्यांत येतो, तो एकंदर उत्पन्नाचा शेंकडा चाळीस टक्क्यांहून कालव्याच्या पाण्यानें भिजत असलेल्या जमिनींत अधिक असतां कामा नये; व इतर जमिनींत एकंदर उत्पन्नाच्या एक तृतीयांशाहून अधिक असतां कामा नये, ह्मणजे शेंकडा जवळ जवळ तीस किंवा चाळीस टके सरकार रयतेपासून घेते असे म्हणण्यास हरकत नाहीं. एक षष्टांश भागाचा म्हणजे शेंकडा सोळा टक्क्यांचा आमचा पुरातन नियम कोठें राहिला? बंगाल ट्रेनन्सी बिलाचा वादविवाद चालला असतां जमिनदारांनीं शेंकडा वीस टक्के घेण्यास हरकत नाहीं, असा नियम करण्याविषयीं मी सूचना केली होती. पण कांहीं भागांत वीस टक्क्यांहूनही जमिनदार लोक कमी घेत असल्यामुळें व वरील नियम केल्यामुळें जमिनदार लोकांना वीस टक्केपर्यंत रयतेपासून घेण्याची इच्छा होईल या भीतीनें सदर सूचना नापसंत केली; व ती नापसंत झाली याबद्दल मला आनंद वाटत आहे. बंगाल्यांत रयत जमिनदारांना सारा देते, मद्रास इलाख्यांत सरकारच स्वतः जमिनदार आहे. मग सरकारानें जमिनदार या नात्यानें रयतेपासून कांहीं ठिकाणी तेहतीस व कांहीं ठिकाणीं चाळीस टके सारा वसूल केला असतां, रयत निःसत्व होऊन दुष्काळास बळी पडावी यांत नवल ते काय ? मद्रासच्या सनदीनोकरांपैकीं मि० राजर्स यांनीं असें मत दिलें आहे कीं, जमिनधाऱ्याचें ओझें फार जड असल्यामुळें कित्येक जमिनी पडपडल्या आहेत. वायव्यप्रांतांत जमिनदारांना जें मिळते त्याचा निम्मा भाग सरकार घेतें, म्हणजे दहा टके सरकारास मिळतात. व मद्रासेस सरकारास शेंकडा तेहतीस किंवा चाळीस टके मिळतात. व बंगाल्यांत रयतेला जमिनदारांना एक षष्ठमांश भागाहून अधिक भाग बहुतेक द्यावा लागत नाहीं.

## मुंबई व पंजाब इलाख्यांतील शेतसारा.

मुंबई इलाख्यांत मद्रासे प्रमाणें रयतवारी पद्धतच चालू आहे; ह्मणजे रयत व सरकार यांमध्यें जमिनदार नसून प्रत्यक्ष रयते पासूनच सारा वसूल करण्यांत येतो. परंतु मुंबईस एवढाच भेद आहे कीं; निरख ठरविणारे कामगार पूर्वीच्या वर्षीच्या साऱ्याची सरासरी लक्षांत घेतात. मद्रासेस केवळ अंदाजावर काम चालते. पंजाबची पद्धत वायव्यप्रांताचे पद्धतीसारखी आहे. परंतु पंजाबांत काय किंवा वायव्यप्रांतांत काय, कायम धाऱ्याची पद्धत अमलांत नसल्यामुळें सरकार देणें केव्हां वाढेल याची रयतेस भीती असते; व त्यामुळें जमिनीची सुधारणा होत नाहीं. बंगालची जमिनदारी पद्धत, वायव्यप्रांताची महालवारी पद्धत, मध्यप्रांतांची मालगुजारी पद्धत व दक्षिणहिंदुस्थानची रयतवारी पद्धत, या निरनिराळ्या पद्धतींचे गुणावगुण गाण्याची माझी इच्छा नाहीं. माझें इतकेंच म्हणणें आहे कीं; रयत कोणत्याही पद्धतीखालची असो, जमिनीच्या उत्पन्नापैकीं, आमच्या शास्त्रकारांच्या म्हणण्याप्रमाणें एक षष्टमांश भाग किंवा जवळ जवळ तितका आपल्या पदरांत पडणार अशी त्यांची खात्री करा व यात फेरबदल होणार नाहीं. असें त्यांस समजू द्या, ह्मणजे दुष्काळासारख्या संकटांतून पार पडण्यांस रयतेस त्राण येईल.

### मध्यप्रांत.

१८९७ सालच्या दुष्काळांत मध्यप्रांताची फार खराबी झाली व हल्लीही तेथे दुष्काळाचें उग्रस्वरूप आहे. मध्यप्रांताची अशी भयंकर स्थिती कां ? असा सहजच प्रश्न उद्भवतो. तीसवर्षांनी एकदां जमिनीची मोजणी करण्याचा नियम वायव्यप्रांतांत आहे; पण मध्यप्रांतांत वीसवर्षांनीच मोजणी दारांची फेरी येते. वायव्य प्रांतांत रयतेपासून जमिनदारांस जो भाग मिळतो त्याचा निम्मा भाग सरकाराकडे जातो. मध्यप्रांतात पूर्वीच्या मोजणीचे वेळीं मालगुजारांच्या पासून त्यांनीं रयतेपासून घेतलेल्या भागापैकीं

शेंकडा पंचावन ते पंचाहत्तर टक्के सरकार घेत असे, व नवीन मोजणींत हें प्रमाण शेकडा पन्नास ते साठ ठरलें आहे. या शिवाय शेंकडा बीराटक्के स्थानिक कराबद्दल मालगुजरांना भरावे लागतात म्हणजे एकंदरींत हल्लींही शेंकडा बहात्तर टके सरकार घेतें. सरकार वसुलाचे प्रमाण जसजसे वाढते व मोजणीची फेरी जशी जशी लवकर येते त्या प्रमाणें रयतेचा कंगालपणाही वाढतो. पूर्वी एका काळीं वायव्यप्रांतांतही जमिनदारांच्या भागापैकीं ६६ टक्कयांची सरकारानें मागणी केली होती. पण ह्या नियमामुळें रयत पिळून निघाल्या सारखी होऊन या शतकांतील पहिल्या पन्नास वर्षांतील लढायांच्या त्रासाहून अधिकत्रस्त झाली. तेव्हां १८५५ सालीं तो नियम रद्द करण्यांत आला. अशी स्थिती असतां हलीं मध्य-प्रांतांत वरील नियमांहून अधिक वाईट नियम कां अमलांत असावा हें मला समजत नाहीं. तीस वर्षांच्या सरकारी नोकरीच्या अनुभवानें माझें असें ठाम मत झालें आहे कीं, ' साऱ्याच्या हलींच्या पद्धतीमुळें दुष्काळ जरी उत्पन्न झालें नाहीत तरी दुष्काळातून पार पडण्यास रयत समर्थ नसते शांतता व शिक्षण ही इंग्रजी राज्यानें आम्हांस मिळाली आहेत खरीं; पण आमच्या जमिनीवर जबर कर बसल्यामुळें व लोकांचे उद्योगधंदे बुडाल्यामुळें दुष्काळाच्या यातना वारंवार भोगाव्या लागतात. '*

वर निर्दिष्ट केलेल्या मिस्तर रोमेशचंद्रदत्त यांचे भाषणानें हिंदुस्थानांतील दुष्काळास आमचें सरकारच विशेष कारणीभूत आहे हें दिसून येईल. आमच्या सरकारनें प्राचीन साऱ्याची पद्धत जर चालू केली तर हिंदुस्थानांतील दुष्काळ पुष्कळअंशीं कमी होईल यांत संशय नाहीं. हिंदुस्थानांत जर दुष्काळ पडावयास नको असेल तर प्रथमतः जमिनीचा सारा कमी करण्याकरितां आमच्या लोकांनीं खटपट करावयास पाहिजे आहे.

---

* निशाणी केसरी.

शेतकऱ्यांच्या निकृष्टस्थिती बद्दल सरकारचीही खात्री होत चालली आहे. शेतकऱ्याची दुःस्थिती होण्यास सरकारनें जें कारण काढिलें आहे तें आपल्या डोळ्यांतील कुसळ दिसतें पण दुसऱ्याच्या मुसळ दिसत नाहीं.' या म्हणीशी अगदीं यथार्थ जुळते. सावकार लोक शेतकऱ्यास वचडून त्याचे सर्वस्व घेतात व त्यामुळें शेतकरी दारिद्रावस्थेप्रत पोचतो असें सरकरचे मत आहे. आणि म्हणूनच कांहीं ठिकाणीं 'शेतकऱ्याची जमिन शेतकऱ्यानें विकत घ्यावी' अशा अर्थाचा कायदा केलेला आहे. परंतु अशानें एखादा शेतकरी गबर होऊन बसेल. सर्वच शेतकऱ्यांची स्थिती या कायद्याने बदलणारी नाहीं. तेव्हां सरकारला जर शेतकऱ्यांची सुस्थिती व्हावी असें वाटत असेल तर प्रथमतः जमिनीचा सारा कायमचा व बंगालचे पद्धती प्रमाणें ठरविला पाहिजे. कायमचा धारा नसल्यानें आस्थापूर्वक कोणताही शेतकरी जमिनीची सुधारणा योग्य प्रकारें करीत नाहीं या कारितां 'जोपर्यंत अनियमित साऱ्याची पद्धत बदलली नाहीं तोंपर्यंत शेतकऱ्यांची कोणत्याही उपायानें सुस्थिती होण्याची आशाच बाळगावयास नको.'

---

# उपसंहार.



वाचकहो ! एकंदरींत हा विषय अतिशय महत्वाचा आहे. निबंध रूपानें ह्याचें विवेचन करणें ह्मणजे मोठ्या विद्वत्तेचें काम आहे. परंतु माझ्या अल्प बुद्धीनें मला जें लिहावेसें वाटलें तें आपणांपुढें सादर केलें आहे. दुष्काळ पडण्याची जीं मुख्य कारणें आहेत त्यांत अनावृष्टी हें मुख्य आहे. या कारणाला जंगलाची तोड किंवा मुळींच जंगल नसणें हें आदीकारण आहे. तेव्हां जंगल वृद्धीकडे लोकांनीं अवश्य लक्ष्य दिलें पाहिजे. दुष्काळ निवारण्याच्या मार्गांत व्यापारोपयोगी साधनांची कमतरता हा दुसरा मुद्दा आहे. याचा आमच्या देशस्थितीशीं विचार केला असतां हल्लीं उपयोगांत आहेत तितकीं साधनें पुरेशीं आहेत. हत्ती उपयोगी पदार्थ खरा, त्याच्या योगानें शोभा आहे, आणि तो दिडकीला मिळत आहे पर दिडकीला हत्ती मिळतो ह्मणून तो घेण्याला किती बरें तयार होतील ? कोणींच होणार नाहीं. कारण तो घेण्याला सोपा आहे तरी परिणामीं फार महाग पडतो. याची अटकळ सर्वांनां होण्यासारखी आहे. याप्रमाणेंच व्यापारोपयोगी साधनांविषयीं समजलें पाहिजे. आमच्या देशांत जर व्यापारच नाहीं तर त्यांचीं साधनें तरी कशाला पाहिजेत ? मिळून व्यापारोपयोगी साध-

नांचा एक देशी विचार केला आहे. तिसरा मुद्दा अदूरदर्शित्वासंबंधी आहे. लोकांचे बाह्य डौल वाढल्यामुळें मितव्ययीपणा नाहींसा झाला आहे. तरी सर्वांनीं मितव्ययीपणा राखण्याकडे लक्ष्य पुरविलें पाहिजे. ह्मणजे दुष्काळाचे प्रसंगीं बाह्य डौलाकडे न गेलेली रक्कम थोड्या दुष्काळास मागें सारील. चवथा मुद्दा— शेतकऱ्यांचे निकृष्टावस्थे संबंधीं होय. कोणत्याही देशापेक्षां आमच्या देशांतील शेतकऱ्यांची स्थिती अतिशय वाईट आहे. तेव्हां 'ऋणं कृत्वा घृतं पिब' असें करून शेतकरी वर्गानें निदान एक वर्षाची तरी सामुग्री संग्रही ठेविल्य शिवाय रहावयाचेंच नाहीं हा बहुतेकांविषयीं आवश्यक असा नियम पाळावा. येणें करून दुष्काळाचें भयंकर स्वरूप कमी होऊन पुष्कळ जीव वाचतील. अस्तु याच विषयासंबंधानें आणखी एक दोन मुद्याचे विवेचन केलें पाहिजे होते. परन्तु कांहीं विशेष अडचणीमुळें तसें करितां आले नाहीं याबद्दल वाईट वाटते. सवडी प्रमाणें ही अडचण दूर करण्याचे तूर्त वाचकांना आश्वासन देऊन ठेवितो.

